**केंद्र पुरस्कृत योजनांच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी सन २०११-१२ करिता कृति आराखडया अंतर्गत उपलब्ध केलेल्या आकस्मिकता निधीस मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: कृमास ४१११/प्र.क्र. १५७ /३-अे**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : ४ जुलै , २०११.**

**संदर्भ :- १) केंद्रीय कृषि मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.६-६/२०११-एमएम, दि. ६ मे,२०११**
**२) केंद्रीय कृषि मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.६-६/२०११ -एमएम, दि. १२ मे,२०११**
**३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्रमांक जा.क्र.नियोजन-४/कृआ-१११२/आ.निधी /प्र.क्र.२२७/२०११, दिनांक २० जून,२०११**

**प्रस्तावना :-**

केंद्रीय कृषि मंत्रालयाने त्यांच्या संदर्भाधीन दि.६ मे,२०११ च्या पत्रान्वये कृती आराखडयाअंतर्गत एकूण रु.८५६१.३४ लक्ष च्या कार्यक्रमास मान्यता दिलेली आहे.तसेच संदर्भाधिन क्रमांक २ अन्वये कृती आराखडयातील पहिल्या हप्त्याचे रु.३७६८.७९५ लाख (रुपये सदतीस कोटी अडुसष्ट लाख एकोणऐंशी हजार आणि पाचशे फक्त) निधी राज्य शासनास मुक्त केला आहे. कृषि विभागाच्या अधिनस्त येणाऱ्या योजनांचा आवश्यक प्रचार-प्रसिध्दी, विविध पातळीवरील क्षेत्रिय यंत्रणेशी समन्वय, अंमलबजावणीच्या काळातील आर्थिक व भौतिक प्रगतीचा आढावा घेण्यासाठी बैठका, पत्रव्यवहार व तद्नुषांगिक बाबीवरील खर्च भागविण्यासाठी केंद्र शासनाने आकस्मिकता निधी म्हणून रु.८३.७५ लक्ष (रु.त्र्याऐंशी लाख, पंच्याहत्तर हजार मात्र) निधीस दिलेल्या प्रशासकीय मान्यतेच्या अधिन राहून राज्याची **प्रशासकीय मान्यता** आणि पहिल्या हप्त्याअन्वये उपलब्ध केलेल्या रकमेच्या अधीन राहून या योजनेतंर्गत सन २०११-१२ मध्ये राबवावयाच्या कार्यक्रमास **वित्तीय मान्यता** देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत योजनांच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी केंद्र शासनाने कृति आराखडया अंतर्गत संदर्भाधीन क्र.१ अन्वये सन २०११-१२ करिता आकस्मिकता निधी म्हणून रु.८३.७५ (रु.त्र्याऐंशी लाख, पंच्याहत्तर हजार मात्र) निधीस प्रशासकीय मान्यता दिली आहे. तेव्हा केंद्र शासनाच्या मान्यतेच्या अधिन राहून रु.८३.७५ (रु.त्र्याऐंशी लाख, पंच्याहत्तर हजार मात्र) च्या कार्यक्रमास राज्य शासनाची **प्रशासकीय** मान्यता आणि केंद्र शासनाने उपलब्ध केलेल्या तरतुदीस अनुलक्षून एकूण रु.४४.०० लक्षच्या (रुपये चव्वेचाळीस मात्र) निधीस वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. या मंजूर रु.४४.०० (रुपये चव्वेचाळीस मात्र) निधीमध्ये केंद्र शासनाचा ७५ टक्के हिस्सा रुपये ३३.०० लक्ष (रुपये तेहतीस लक्ष मात्र) व राज्य शासनाचा २५ टक्के हिस्सा रुपये ११.०० लक्ष (रुपये अकरा लक्ष मात्र) असा राहील.

२. आकस्मिक खर्चाच्या बाबीसाठी म्हणून मंजूर केलेला उपरोक्त निधी हा योजनांच्या आवश्यक प्रचार -प्रसिध्दी, विविध पातळीवरील क्षेत्रिय यंत्रणेशी समन्वय, अंमलबजावणीच्या काळातील आर्थिक व भौतिक प्रगतीचा आढावा घेण्यासाठी बैठका, पत्रव्यवहार व तदअनुंषंगिक बाबींवरील खर्च इ. बाबीवरील खर्च भागविण्यासाठी करण्यात यावा व तो खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

<u>केंद्र हिस्सा</u>

**मागणी क्र.डी-३**
**२४०१, पीक संवर्धन,**
**१०९, विस्तार व प्रशिक्षण,**
**(०१)(३३) कृषि विस्तारासाठी आधारभूत माहिती,**
**(२४०१ ४०६२)**
**१७ संगणक खर्च,**
**३३ अर्थसहाय्य**

<u>राज्य हिस्सा</u>

**मागणी क्र.डी-३,**
**२४०१, पीक संवर्धन,**
**१०९, विस्तार व प्रशिक्षण,**
**(०१)(३०) कृषि विस्तारासाठी आधारभूत माहिती,**
**(२४०१ ३७२५)**
**१७ संगणक खर्च,**
**३३ अर्थसहाय्य**

**३.** हा मंजूर केलेला निधी खर्च करण्यास तसेच जिल्हानिहाय निधी वितरण करण्यास **संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन, ) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी** म्हणून घोषित करण्यात येत आहे. मंजूर बाबीवरील खर्च मासिक कॅशफ्लोच्या मर्यादेत राहील याची दक्षता घेण्याची तसेच संगणकीय अर्थसंकल्पिय प्रणालीद्वारे (BDS) वितरण करण्याची जबाबदारी **संचालक,( कृषि प्रक्रिया व नियोजन,) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे, यांची राहील.**

४. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ९८/११/व्यय-१, दि.२३ जून, २०११ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार व प्रधान सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०११०७०४११०४३५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

**[वीणा राऊत]**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र राज्य**

**प्रति,**

आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे-**१,**
संचालक, कृषि प्रक्रिया व नियोजन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती)
सर्व संचालक/ सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
विभागीय कृषी सह संचालक (सर्व),
जिल्हाधिकारी (सर्व), बृहन्मुंबई व मुंबई उपनगर हे जिल्हे वगळून,
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व), बृहन्मुंबई व मुंबई उपनगर हे जिल्हे वगळून,
जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व), बृहन्मुंबई व मुंबई उपनगर हे जिल्हे वगळून,

जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी (सर्व),
सर्व मुख्य वित्त व लेखा अधिकारी (जिल्हा परिषद),
सर्व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद
महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखा परिक्षा/ लेखा अनुज्ञेयता), मुंबई
महालेखापाल-२, महाराष्ट (लेखा परिक्षा/ लेखा अनुज्ञेयता), नागपूर
माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मंत्रालय,
वित्त विभाग, नियोजन विभाग, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती),
सर्व कक्ष अधिकारी , कृषि व पदुम विभाग,
मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
निवड नस्ती कार्यासन ३-अे.